सहकार न्यायालय, नांदेड कार्यालयासाठी नांदेड वाघाळा शहर महापालीका,नांदेड हद्दीतील इमारत देवाशिष प्लॉट, घामोडिया फॅक्टरी, डॉ.लेन नांदेड या इमारतीचा पहिला मजल्यावरील अंदाजे १९०० चौ.फुट जागा भाडेतत्वावर घेण्यास व भाडे प्रदान करण्यास वित्तीय व प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : संकीर्ण-२०२०/प्र.क्र. ३५/२२-स,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय(वि),मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १७ ऑगस्ट, २०२०.

संदर्भ :- महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.
१) मरासअन्यामुं/का.भाडे/४११/२०२०, दिनांक १०.०६.२०२०.
२) मरासअन्यामुं/सह न्या नांदेड/इमारत/४२२/२०२०, दिनांक २२.०६.२०२०.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांच्या अधिपत्याखालील मा.सहकार न्यायालय, नांदेड या कार्यालयाची सध्या अस्तित्वात असलेली न्यायालयीन इमारत जिर्ण व मोडकळीस अवस्थेत आलेली होती. त्यामुळे सहाय्यक आयुक्त वजीराबाद, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड यांनी मोडकळीस आलेल्या बांधकाम पाडून टाकणेबाबत संबंधीत जागा मालकास नोटीस दिलेली आहे. महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांच्या दिनांक २१.६.२०२० च्या पत्रान्वये सदर अस्तित्वातील इमारतीचा काही भाग पावसामुळे पडले व अनेक खटल्याचे कागदपत्रे पावसामुळे ओले झाल्याने सदर जागेत सहकार न्यायालय, नांदेड यांना कार्यालयीन कामकाज करणे शक्य नाही. सबब सदर न्यायालय नवीन भाडेतत्वावरील जागेत स्थलांतरीत करण्यास व सदर नविन जागेचा ताबा घेण्यास परवानगी दिलेली आहे. त्यामुळे सदर न्यायालयाच्या कार्यालयासाठी अंदाजे १९०० चौ.फूट जागेकरीता नविन खाजगी इमारत भाडेत्तवावर घेणेबाबत इमारतीच्या मालक श्री.जितेंद्र हरीप्रसादजी दायमा, रा.देवाशिष कॉम्लपेक्स, पहिला मजला, एस.बी.आय. बँकेसमोर, घामोडीया फॅक्टरी, डॉक्टर लेन, नांदेड, नांदेड वाघाळा महापालीका हद्द, नांदेड यांच्यासोबत करारनामा करण्यास व संबंधित सार्वजनिक बांधकाम विभागाने प्रमाणित केलेले भाडे अदा करण्यास वित्तीय व प्रशासकीय मान्यता देण्याबाबत महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांनी संदर्भाधिन पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**<u>शासन निर्णय</u> :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई यांच्या अधिपत्याखालील मा.न्यायाधीश, सहकार न्यायालय, नांदेड या कार्यालयासाठी नांदेड वाघाळा महापालीका हद्दीतील इमारत देवाशिष प्लॉट नं. ४५, सर्वे नं.४६, ४७ मधील महापालीका नं.३-१-३९६ चतु:सिमा पूर्वेस ४० फुट रोड पश्चिमेस रिकामा प्लॉट नं.४४ दक्षिणेस ४० फुड रोड, उत्तरेस प्लॉट नं.४६, घामोडिया फॅक्टरी, डॉ.लेन नांदेड या इमारतीचा पहिला मजल्यावरील अंदाजे १९०० चौ.फूट जागा भाडेतत्वावर घेण्यास व त्यासाठी जागा मालकास दरमहा रुपये ८५,०००/- (रुपये पंच्याऐंशी हजार फक्त) (पाणीपट्टी,विद्युत देयक,महा-नगरपालिका व इतर कर वगळून) इतके भाडे अदा करण्यास वित्तीय व प्रशासकीय मान्यता याद्वारे प्रदान करण्यात येत आहे.

२. यासाठी वरील होणारा खर्च, मागणी क्रमांक व्ही-२, २४२५, सहकार, (०१) (०९) महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, (२४२५०१०२) (अनिवार्य) १४-भाडेपट्टी व कर, या उद्दिष्टाअंतर्गत सन २०२०-२०२१ पासून दर वर्षात मंजूर होणाऱ्या अनुदानातून संबंधीत सक्षम प्राधिकारी यांना असलेल्या वित्तीय अधिकारास अनुसरुन भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: व्हीअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३, विनियम/भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उप विभाग-एक मधील अनु.क्र.१०, नियम क्रमांक ११५ आणि महाराष्ट्र आकस्मिक खर्च, १९६५ नियम १४७ (क) खालील टीप-१, कार्यालयीनसाठी जागा भाडयाने घेण्यास मंजूर करण्याबाबतचे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व वित्त विभाग अनौ.सं.क्र.२१२/२०२०/व्यय-२, दिनांक २२.०७.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय,महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेवसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००८१७१६५२५१९३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJU KALLUJI NARPANDE

Digitally signed by RAJU KALLUJI NARPANDE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=445c05397d3e5fac583c028b06de2a1fa2b53743e982f5c31c9f3ffb560b0c16, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f8faa195025519ecce143f48fe16b8572d279b7779146441b412b267fb25acd8, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAJU KALLUJI NARPANDE
Date: 2020.08.17 17:03:38 +05'30'

**(राजू नरपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.अध्यक्ष, विधान सभा/मा.सभापती, विधानपरिषद,विधान भवन,मुंबई.

२. मा.मंत्री (सहकार), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. मा.राज्यमंत्री (सहकार), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४. सर्व मा. विधान सभा सदस्य/विधान परिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.

५. प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,

६. सर्व विभागीय आयुक्त,

७. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,

८. सर्व जिल्हाधिकारी,

९. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई

१०. मा.न्यायाधीश,सहकार न्यायालय, नांदेड

११. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड

१२. उपसचिव, कार्यासन (५-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,

१३. अवर सचिव (१७-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,

१४. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (विनियम) मंत्रालय, मुंबई,

१५. महालेखापाल (ले व ह) महाराष्ट्र,२, नागपूर.

१६. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र,२, नागपूर.

१७. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड,

१८. निवड नस्ती (२२- स).